राज्यातील पाटबंधारे प्रकल्पांतर्गत पात्र असलेल्या बाधित प्रकल्पग्रस्तांना वाटप करण्यात येणाऱ्या पर्यायी जमिनीच्या कब्जेहक्काच्या रकमेची परीगणना करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- आरपीए-२०२१/प्र.क्र.१२९/र-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक- १४ ऑक्टोबर, २०२१

वाचा:- १. सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्र.आरपीए/१५५९/र-१, दि. २९ सप्टेंबर १९६९
२. सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्र.आरपीए/११७२/२८९६९र-१, दि.१८ ऑगस्ट १९७२
३. सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्र.आरपीए/१०७१/४१५३३/र-१, दिनांक ०७ जुन १९७३
४. शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.आरपीए/१०७१/Occupancy/र-१, दिनांक २० जुन १९७३
५. शासन निर्णय महसुल व वन विभाग क्र.बीयुडी/१०७१/र-१, दिनांक ०१ जुन १९७४
६. शासन निर्णय महसुल व वन विभाग क्र.आरपीए/१०७१/ Occupancy /र-१, दिनांक २९ नोव्हेबंर १९७९
७. शासन ठराव महसुल व वन विभाग क्र.आरपीए/१०८६/सी.आर. ३९४०/र-१, दिनांक २४ नोव्हेबंर १९८६
८. शासन निर्णय महसुल व वन विभाग क्र.आरपीए १०८६/सीआर-४४४१/र-१, दिनांक ९ डिसेंबर, १९८६
९. शासन परिपत्रक महसुल व वन विभाग क्र.आरपीए १०८६/सीआर-४४४१/र-१, दिनांक २ फेब्रुवारी,१९८७
१०. महाराष्ट्र प्रकल्पबाधित व्यक्तिंचे पुनर्वसन अधिनियम, १९७६
११. महाराष्ट्र प्रकल्पबाधित व्यक्तिंचे पुनर्वसन अधिनियम, १९८६
१२. महाराष्ट्र प्रकल्पबाधित व्यक्तिंचे पुनर्वसन अधिनियम, १९९९

प्रस्तावना-

राज्याच्या सर्वांगीण प्रगतीसाठी राबविण्यात आलेल्या तसेच राबविण्यात येत असलेल्या विविध प्रकल्पांसाठी शेतकऱ्यांच्या जमिनी संपादीत करण्यात आल्या आहेत. प्रचलित शासन निर्णय, पुनर्वसन अधिनियम १९७६,१९८६,१९९९ लागु असलेल्या पाटबंधारे प्रकल्पांमुळे बाधित झालेल्या पात्र प्रकल्पबाधित शेतक-यांना पर्यायी जमिनीचा पर्याय उपलब्ध करुन देण्यात आला आहे. शासन निर्णय दि २० जुन १९७३ मध्ये पर्यायी जमिनीच्या कब्जेहक्काची रक्कम निर्धारित करण्याबाबतची कार्यपध्द्ती

विहित करण्यात आली आहे. प्रचलित शासन निर्णय, पुनर्वसन अधिनियम १९७६,१९८६,१९९९ लागु असलेल्या पाटबंधारे प्रकल्पामुळे बाधित झालेल्या शेतक-यांना वाटप केलेल्या पर्यायी जमिनीची कब्जेहक्काच्या रकमेची परिगणना करण्याच्या कार्यपध्द्तीमध्ये एकसुत्रता व एकरुपता आणणे व पात्र प्रकल्पग्रस्त शेतक-यास वाटप केलेल्या पर्यायी जमीनीच्या कब्जेहक्काच्या रकमेची परिगणना करण्यासाठी कार्यपध्द्ती व सुत्र निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>-**

राज्यातील पाटबंधारे प्रकल्पामुळे बाधित होणाऱ्या पात्र प्रकल्पग्रस्तांना त्या त्या पाटबंधारे प्रकल्पास लागु असलेल्या प्रचलित शासन निर्णयानुसार व पुनर्वसन अधिनियमातील तरतुदीनुसार त्यांची अनुज्ञेयता तपासून वाटप करण्यात येणा-या पर्यायी जमीनीची कब्जेहक्काची रक्कम खालील कार्यपध्दती व सुत्रानुसार निश्चित करण्यात येईल:-

**(१)** पात्र प्रकल्पग्रस्त शेतक-यास वाटप करण्यात येणारी पर्यायी जमीन ही शासनाने संपादित केली असेल तर अशा जमिनीच्या संपादनासाठी देण्यात आलेल्या मोबदल्याची रक्कम अधिक अशा जमिनीच्या सीमांकनावर,समतलावर, सुधारणेवर, संयुक्त मोजणीवर व सीमा चिन्हे लावण्यावर जो खर्च झाला असेल ही सदर जमिनीची कब्जेहक्काची रक्कम असेल व अशा संपादित जमिनीचे वाटप पात्र शेतक-यास पर्यायी जमिन म्हणुन ज्या तारखेस करण्यात येईल त्या तारखेपर्यंत अशा जमिनीच्या संपादनासाठी शासनाने खर्च केलेल्या रकमेवर प्रति वर्षी १२ टक्के दराने व्याजाची आकारणी करुन सदर जमिनीच्या कब्जेहक्काची रक्कम म्हणुन परिगणना करण्यात येईल.

**(२)** पात्र प्रकल्पग्रस्त शेतक-यास वाटप करण्यात येणारी जमीन ही मूलत: शासनाच्या मालकीची जमीन असेल तर वाटपाच्या दिनांकास सदर जमिनीची सिध्दशीघ्रगणकानुसार येणारी किंमत ही कब्जेहक्काची रक्कम असेल.

**(३)** वरील (२) व (३) येथे नमूद सुत्रानुसार पर्यायी जमिनीची कब्जेहक्काची रकमेची गणना करतांना पात्र प्रकल्पबाधित शेतक-याने त्यास वाटप करावयाच्या पर्यायी जमिनीच्या संभाव्य कब्जेहक्काच्या रक्कमेपोटी त्याच्या संपादित जमिनीच्या मोबदल्याच्या रकमेतुन ६५ टक्के/ ७५ टक्के रक्कम शासनाकडे ठेव म्हणून जमा केलेल्या रकमेवर पर्यायी जमिनीच्या वाटपाच्या दिनांकापर्यंत प्रति वर्षी १२ टक्के दराने व्याजाची आकारणी करण्यात येईल व सदर रक्कम ही पर्यायी जमिनीच्या कब्जेहक्काच्या रकमेतुन वजा करण्यात येईल व उर्वरित रक्कम संबंधित शेतक-याकडुन वसुल करण्यात येइल.

**(४)** पुनर्वसन अधिनियम १९९९ लागु असलेल्या पाटबंधारे प्रकल्पामुळे बाधित होणा-या शेतक-याने कलम १६(२) (ब) नुसार पर्यायी जमिनीची कब्जेहक्काची रक्कम जमा केल्यानंतर त्यास लाभक्षेत्रामध्ये जमिन वाटप करण्यात आलेले नसल्यास त्यास कलम १६(४) मध्ये नमूद तरतुदीनुसार दर महा चारशे रुपये या दराने देय असलेल्या विशेष अनुदानाच्या रकमेवर पर्यायी जमिनीच्या वाटपाच्या दिनांकापर्यंत प्रति वर्षी १२ टक्के दराने व्याजाची आकारणी करण्यात येईल व सदर रक्कम ही पर्यायी जमिनीच्या कब्जेहक्काच्या रकमेतून वजा करण्यात येईल व उर्वरित रक्कम संबंधित शेतक-याकडुन वसुल करण्यात येइल.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०२११०१४१७०५३४७७१९ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

KHATALE GANESH TUKARAM

Digitally signed by KHATALE GANESH TUKARAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=6d297056650ba782c82ae82002633d7957c9b8ca77baaaab2baf759e684e202f, pseudonym=74B8388710AFF985067325F80A5D1E13188FE94B, serialNumber=A31A9595B748752B50EA2D029326724E644B1CE230DFF9D16AB951C1AB20C6A5, cn=KHATALE GANESH TUKARAM
Date: 2021.10.14 18:19:21 +05'30'

**( गणेश तुकाराम खताळे )**
**कक्ष अधिकारी, महसुल व वन विभाग**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल महोदयांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मा.मंत्री, मदत व पुनर्वसन यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) सचिव ( मदत व पुनर्वसन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
५) सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
६) महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
७) महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर,
८) सर्व विभागीय आयुक्त,
९) सव जिल्हाधिकारी,
१०) सर्व जिल्हा पुनर्वसन अधिकारी,
११) सर्व कार्यासन (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२) निवड नस्ती, कार्यासन र-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय. मुंबई.